पदुम सहकारी संस्थांचे सांविधीक लेखा परिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४१५ अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०१५ ते २९.०२.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**

**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. राजस २०१५/ प्र.क्र.११०/ ५ स,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक :- १३ ऑक्टोंबर, २०१५

वाचा :-

१) शासन निर्णय क्र.- राजस-१००८/ प्र.क्र.५३८/ ५-स, दि. ५/५/२०११

२) शासन निर्णय क्र. राजस २०१५/ प्र.क्र.११०/ ५ स दि.२१/०४/२०१५ व शुध्दीपत्रक दि.२२/०४/२०१५

३) अपर निबंधक, सहकारी संस्था (प्रशासन), सहकार आयुक्त व निबंधक कार्यालय, पुणे यांची पत्रे क्र.आस्थापना/कक्ष-१/पदुम/मुदतवाढ/१७७/२०१५, दि.२६/२/२०१५ व क्र.३४९/२०१५, दि.१०/४/२०१५ व ९२१/२०१५ दि. २४/०८/२०१५

४) शासन पत्र समक्रमांक दि.२६/३/२०१५.

५) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१, दि.२०/२/२०१५

**शासन निर्णय :-**

पदुम सहकारी संस्थांचे सांविधीक लेखापरीक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४१५ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्र.२ च्या दि.२१/४/२०१५ च्या शासन निर्णय व दि.२२/०४/२०१५ च्या शुध्दीपत्रका नुसार दि.१/३/२०१५ ते ३०/८/२०१५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. संदर्भाधिन क्र.३ च्या सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्या दि.२४/८/२०१५ च्या पत्रांन्वये सदर पदांना दि.१/९/२०१५ ते दि. २९/२/२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्याची विनंती करण्यात आली आहे.

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील स्थायी/अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सुधारीत आकृतीबंध निश्चित करुन त्याबाबतचा शासन निर्णय दि.५/५/२०११ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. सदर आकृतीबंधात वरील पदांचा समावेश आहे. वित्त विभागाच्या दि.१/९/२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आकृतीबंधाचा दर तीन वर्षानी आढावा घेणे आवश्यक आहे. त्यानुसार शासन निर्णय दि.५/५/२०११ नुसार निर्गमित केलेल्या आकृतीबंधास दि.५/५/२०१४ रोजी तीन वर्षे पूर्ण झालेली आहेत. सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्याकडुन कार्यवाही सुरु आहे.

सदर प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यानंतर छाननीअंती प्रस्ताव मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तर समितीच्या मान्यतेस्तव सादर करण्यात येईल. या कार्यवाहीस काही कालावधी लागणे अपेक्षित आहे. दरम्यानच्या कालावधीत सदर पदांबाबत निर्णय घेणे आवश्यक असल्याने सदर पदांना दि.१/९/२०१५ ते दि.२९/२/२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

उपरोक्त ४१५ अस्थायी पदांचा कार्यालयनिहाय विगतवारी विशेष कार्यकारी अधिकारी, सहकारी संस्था, पदुम, लेखापरीक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे स्वतंत्ररित्या प्रसृत करतील.

सदर पदांच्या वेतन व भत्त्यांवरील खर्च कृषि व पदुम विभागाने "२४०४-दुग्धव्यवसाय विकास (योजनेतर), ००१-संचालक व प्रशासन, (०५)(०१) दुग्ध सहकारी सोसायटीसाठी हिशेब तपासणी मंडळ (२४०४ ०२६१)" या लेखाशिर्षाखाली सन २०१५-२०१६ हया वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

वित्त विभाग, शासन निर्णय, दि.२०/२/२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या संगणक सांकेतांक २०१५१०१३१७५४४४०७०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2015.10.13 18:18:49 +05'30'

**( सु. मु. धाडवे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.
३) मत्स्यव्यवसाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) विशेष कार्यकारी अधिकारी, लेखापरीक्षा मंडळ, पदुम, मुंबई.
५) सर्व सहनिबंधक (लेखापरिक्षण), सहकारी संस्था
६) सर्व जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था,

७) महालेखापाल १, महाराष्ट्र मुंबई (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

८) महालेखापाल २, महाराष्ट्र नागपूर (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१०) निवासी लेखा अधिकारी, मुंबई

११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

१२) वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१९),मंत्रालय, मुंबई

१३) कक्ष अधिकारी (पदुम-१०), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय

१४) निवड नस्ती ५-स.